परभणी येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलच्या २६ अस्थाई पदांना मुदतवाढ.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१७/प्र.क्र.९६/आरोग्य-४
१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीख: २० जुलै, २०१७.

वाचा

१) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः डिएचसी/३०१०/प्र.क्र.१८८/आरोग्य-३, दि.२.०२.२०११.
२) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१६/प्र.क्र.५२/आरोग्य-४, दि.२८.१०.२०१६.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७.
४) उपसंचालक, (शुश्रुषा), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/शुश्रुषा/कक्ष-९/टे-४/ अपदे-जीएनएम परभणी/सन २०१७-१८/१७, दि.२२.०६.२०१७

शासन निर्णय

परभणी येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलसाठी २६ पदांच्या निर्मितीस उपरोक्त क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सदर २६ अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये दि.१.१०.२०१६ ते दि.२८.०२.२०१७ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. आता खालील एकूण २६ अस्थाई पदांना दि.१.०३.२०१७ ते दि.३०.०९.२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदनाम व संवर्ग | वेतनश्रेणी | पदसंख्या/ जी.एन.एम |
|---|---|---|---|
| १ | प्राचार्य (वर्ग-३) | ९३००-३४८०० (४४००) | १ |
| २ | उपप्राचार्य (वर्ग-३) | ९३००-३४८०० (४४००) | १ |
| ३ | पाठ्यनिर्देशिका (वर्ग-३) | ९३००-३४८०० (४४००) | १४ |
| ४ | लघुटंकलेखक(वर्ग-३) | ५२००-२०२०० (२४००) | १ |
| ५ | लिपिक (वर्ग-३) | ५२००-२०२०० (२४००) | १ |
| ६ | ग्रंथपाल (वर्ग-३) | ५२००-२०२०० (२८००) | १ |
| ७ | प्रयोगशाळा सहाय्यक (वर्ग-३) | ५२००-२०२०० (२०००) | १ |
| ८ | वॉर्डन (वर्ग-३) | ५२००-२०२०० (२८००) | ३ |
| ९ | शिपाई (वर्ग-३) | ४४४०-७४४० (१३००) | ३ |
| | **एकुण** | | **२६** |

सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्रमांक.आर-१ मुख्य लेखाशीर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-पंचवार्षिक योजनातंर्गत योजना-राज्य योजनातंर्गत योजना, (०६) (०१)-मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने (२२१० ०२२६)" व "२२११-कुटूंब कल्याण, ००३-प्रशिक्षण, (०१)-कुटूंब कल्याण

प्रशिक्षण-१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना, (०१)(०२)- सहायक परिचारिका प्रसविका, दाई व आरोग्य प्रचारक या निमवैद्यकीय कर्मचा-यांचे प्रशिक्षण (२२११ ०१११) " या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ साठीच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१९११५५४९७५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandit Jadhav

Digitally signed by Pandit Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, cn=Pandit Jadhav
Date: 2017.07.20 17:11:34 +05'30'

**पं. खं. जाधव**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कु.क., मा.बा.सं. व शा.आ.), पुणे
३. उपसंचालक, आरोग्य सेवा (शुश्रुषा), मुंबई.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ.
५. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र (लेखा व लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, परभणी
७. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
८. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).